**सहायक कक्ष अधिकारी पदावरुन कक्ष अधिकारी**
**पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र.कअप १२२३/प्र.क्र.७९/प्रशा-२ (१४ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - २३ ऑगस्ट, २०२४

## आदेश

मंत्रालयीन विभागातील खालील सहायक कक्ष अधिकारी [गट-ब (अराजपत्रित) वेतनश्रेणी S-१४ : रु. ३८६००-१२२८००] यांना कक्ष अधिकारी [गट-ब (राजपत्रित) वेतनश्रेणी S-१७: रु.४७६००-१५११००] पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे तसेच सदर सहायक कक्ष अधिकारी यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १) | श्री | विपीन वि. कळसकर | इमाव | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| २) | श्री | प्रतापसिंह म. खरात | भज (क) | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| ३) | श्री | वसुदेव मा. कराड | भज (ड) | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | मृद व जलसंधारण विभाग |
| ४) | श्री | प्रशांत सू. शिर्के | इमाव | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| ५) | श्री | ज्ञानेश्वर सा. गोपतवाड | इमाव | आदिवासी विकास विभाग | आदिवासी विकास विभाग |
| ६) | श्री | राजू ल .राऊत | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ७) | श्री | गणेश सु .भदाणे | इमाव | सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |
| ८) | श्रीमती | सारीका उ. पाटील | खुला | गृह विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ९) | श्री | जगदीश मा. खेडकर | भज (ड) | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| १०) | श्री | सोमनाथ ल .लवांडे | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ११) | श्री | संदिप द. पवार | इमाव | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| १२) | श्री | सचिन श्री. साटोटे | भज (ब) | नगर विकास विभाग | नगर विकास विभाग |

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १३) | श्री | विष्णु रा. मोहोळकर | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| १४) | श्री | निलेश का. हरड | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| १५) | श्री | व्यंकटेश ग. आयलाने | इमाव | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| १६) | श्रीमती | नम्रता श. भारसाखळे | अजा | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| १७) | श्री | विशाल सि. कांबळे | अजा | नगर विकास विभाग | नगर विकास विभाग |
| १८) | श्री | प्रताप रा. सातपुते | अजा | गृहनिर्माण विभाग | महसूल व वन विभाग |
| १९) | श्री | सुरज ह. मुनेश्वर | अजा | आदिवासी विकास विभाग | आदिवासी विकास विभाग |
| २०) | श्रीमती | प्रियांका दु. साबळे | भज (ड) | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| २१) | श्री | विजयकुमार भा. सावंत | अजा | मृद व जलसंधारण विभाग | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |
| २२) | श्री | गणेश र. कठाळे | अजा | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग **(प्रतिनि-रा.मा.आ. अमरावती)** | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| २३) | श्रीमती | अमृता भा. मनवे | खुला | महसूल व वन विभाग | कृषि व पदुम विभाग |
| २४) | श्री | दिलीप सो. सोळसे | अजा | वित्त विभाग **(प्रतिनि-लो.से.ह.आ.नाशिक)** | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| २५) | श्रीमती | वंदना प्र. दगडे | खुला | गृह विभाग | गृह विभाग |
| २६) | श्रीमती | प्रभा म. बांगर | अजा | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| २७) | श्री | विवेक वा. जगदाळे **(दिव्यांग-क्षीणदृष्टी)** | खुला | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

**२. अ.क्र.१२ येथे नमूद श्री.सचिन श्री.साटोटे, सहायक कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग यांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीनंतरची पदस्थापना नगर विकास विभागात करण्यात येत आहे. तथापि, विधानसभा सार्वत्रिक निवडणूकीचे कामकाज संपन्न होईपर्यत श्री.साटोटे यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभाग/कार्या-३३ (निवडणूक) यांचेकडे तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येत आहेत. श्री.साटोटे यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येणार असल्याने त्यांच्या वेतनादी विषयक बाबी नगर विकास विभागाकडून हाताळण्यात येतील.**

**३.** पुढील अटीच्या अधीन राहून संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांना कक्ष अधिकारी संवर्गात रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) **सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तदर्थ स्वरुपातील पदोन्नती राहील.**

२) सदर पदोन्नती निव्वळ तदर्थ स्वरुपाची असल्याने या तदर्थ पदोन्नतीच्या परिणामी पदोन्नत अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३) सरळसेवा व पदोन्नत कक्ष अधिकाऱ्यांनी परस्पर सेवा ज्येष्ठतेबाबतत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट पिटीशन क्र.२९८२/२०००, क्र.२९८६/२०००, ४९५८/२००३ व क्र.३३७४/२०११ मा.न्यायालयाने दिनांक ०६.०८.२०१८ रोजी निकाली काढल्या असून, मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार दिनांक ०१.०१.१९८६ पासूनच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत करण्यात येत आहेत. सदर पदोन्नत्या या सुधारीत ज्येष्ठतासुचीच्या अधीन राहून देण्यात येत आहेत. मा.न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार निवडसूच्या / ज्येष्ठतासूच्या सुधारित झाल्यानंतर पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांचे ज्येष्ठतासूचीतील स्थान खाली जाणे अथवा पदानवत होणे या बाबी उद्भवू शकतात. मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशाविरूध्द पदोन्नत अधिकाऱ्यांनी मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ दाखल केली आहे. सदर तदर्थ पदोन्नत्या या मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल झालेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ च्या अधीन राहतील.

४) मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०४.०८.२०१७ रोजी पदोन्नतीतील आरक्षणाबाबत शासनाने निर्गमित केलेला दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय रद्दबातल ठरविला आहे. सदर निर्णयाविरुध्द शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर तात्पुरत्या पदोन्नत्या या राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन राहतील.

५) सदर तात्पुरत्या पदोन्नत्या मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र.११९२/२०२२ (श्री.विशाल टेके व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन) च्या अधीन राहतील.

६) सहायक कक्ष अधिकारी पदावरुन कक्ष अधिकारी पदावर प्रस्तावित सन २०२३-२४ ची निवडसूची तदर्थ स्वरुपाची असून सदर पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. **परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.**

७) सदर पदोन्नत्या तदर्थ स्वरुपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोटयात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

८) संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांनी कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ व सामान्य प्रशासन विभाग, शा.नि., क्र.एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दिनांक ०१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्याचे नांव सन २०२३-२४ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२४-२५ व २०२५-२६) होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२६-२७) कक्ष अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

९) सदर अधिकाऱ्यांची कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित विभागाने खातरजमा करुन संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु वा प्रस्तावित असल्यास या विभागास अवगत करावे.

१०) पदोन्नत अधिकाऱ्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून **तीस दिवसांमध्ये** कक्ष अधिकारी पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

११) संबंधित विभागांनी कार्यमुक्ततेच्या तसेच रुजू करुन घेतल्याच्या आदेशाच्या प्रती साप्रवि/कार्यासन प्रशा-२ (१४ब) ला पाठवाव्यात.

४. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरण व महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम, २०२२ मधील तरतूदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांवर बंधनकारक राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२३१८०१३०८७०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.23 18:16:42 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित सहायक कक्ष अधिकारी **(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
**(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**

२) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग

३) कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-सेवा-१/२/३ (१२), प्रशा-१ (१४), व प्रशा-३ (१४अ)

४) निवडनस्ती/कार्या-प्रशा-२(१४ब)